उपसंचालक (माहिती), गट-अ या संवर्गात तदर्थ पदोन्नती देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः मावज-२०१५/प्र.क्र.१७२/३४-अ,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
तारीख: १९ नोव्हेंबर, २०१६.

**आदेश**

माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातील वरिष्ठ सहायक संचालक (माहिती)/ जिल्हा माहिती अधिकारी/ वरिष्ठ उपसंपादक/ जनसंपर्क अधिकारी, गट-अ (कनिष्ठ) ( वेतन बँड ९३००-३४८०० ग्रेड वेतन ५०००) संवर्गात कार्यरत असलेल्या खालील अधिकाऱ्यांना उपसंचालक (माहिती), गट-अ ( वेतन बँड ९३००-३४८०० ग्रेड वेतन ६६००) या पदावर खालील अटींच्या अधीन राहून पदोन्नतीच्या कोट्यातील रिक्त पदावर तदर्थ पदोन्नती देण्यात येत असून कामकाजाच्या व प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने त्यांची रकाना (४) येथे त्यांच्या नावापुढे दर्शविलेल्या पदावर पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव व वर्तमान पदनाम | प्रवर्ग | पदोन्नतीने पदस्थापनेचे ठिकाण, महसूली विभाग व नियुक्तीचा जिल्हा |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री. गो. शं. अहंकारी,<br>जिल्हा माहिती अधिकारी, पुणे | खुला | उपसंचालक (माहिती)(वृत्त), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुख्यालय, मुंबई. |

**अटी व शर्ती :-**

१) सदर तात्पुरती पदोन्नती ही मा. उच्च न्यायालयात प्रलंबित असलेल्या याचिका क्र.२७९७/२०१५ च्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

२) सदर पदोन्नती ही निवडसूचीस महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून मिळणाऱ्या मान्यतेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

३) सदर पदोन्नती तदर्थ असल्याने हि पदोन्नती ११ महिन्यांसाठी किंवा नियमित उमेदवार उपलब्ध होईपर्यंत, यापैकी जे अगोदर घडेल, त्या कालावधीपर्यंत असेल.

४) या तदर्थ पदोन्नतीमुळे वरील अधिकाऱ्यांना नियमित पदोन्नतीचे म्हणजेच ज्येष्ठतेचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

२. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१११९१६३७०५५७०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ramkisan Narayanrao Musale

Digitally signed by Ramkisan Narayanrao Musale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e28f6332f6edfebdfb055bf154f99ec0b0d9e613209e20e7a215f026da6875ae, cn=Ramkisan Narayanrao Musale
Date: 2016.11.19 16:40:17 +05'30'

**( रा. ना. मुसळे )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सचिव (मावज), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
२. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
३. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई,
४. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व परिक्षा), मुंबई,
५. संचालक (माहिती) (प्रशासन), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
६. संचालक (माहिती) (वृत्त व जनसंपर्क),माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,मंत्रालय, मुंबई,
७. उपसंचालक (माहिती), विभागीय माहिती कार्यालय, पुणे विभाग, पुणे,
८. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
९. उपसंचालक (लेखा), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई,
१०. जिल्हा माहिती अधिकारी, पुणे,
११. संबंधित अधिकारी (मा. व ज. मार्फत),
१२. निवडनस्ती.